**आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमाचे शिक्षण घेत असलेल्या दिव्यांग विद्यार्थ्यांना परीक्षेकरीता सोयी सवलती देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

**शासन निर्णय क्र.एमईडी १०१७/प्र.क्र.३३१/१७/शिक्षण-२**

गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते.रुग्णालय, संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.

**दिनांक : ०७ जुलै, २०१८.**

**वाचा :**

१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३०२/विशि-३, दिनांक ०४ मार्च, २०१७.
२. शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, समक्रमांक दिनांक ३१ जानेवारी, २०१८.

**प्रस्तावना :**

राज्यातील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील संस्थांमध्ये उच्च शिक्षण/ विद्यापीठ शिक्षण घेणाऱ्या दिव्यांग विद्यार्थ्यांना संबंधित अभ्यासक्रमाच्या परीक्षेकरीता त्यांच्या वर्गवारीनुसार विशिष्ट सोयी सवलती लागू करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या उक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने उच्च शिक्षण घेणाऱ्या दिव्यांग विद्यार्थ्यांना लागू करण्यात आलेल्या सोयी सवलती हया आरोग्य विज्ञानाच्या विविध अभ्यासक्रमांस प्रवेशित झालेल्या दिव्यांग विद्यार्थ्यांना कशा प्रकारे लागू करता येतील याबाबत आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमांचे विनियमन करणाऱ्या संबंधित केंद्रीय परिषदांचे नियम/विनियमन विचारात घेऊन शासनास शिफारशींसह अहवाल सादर करण्याच्या अनुषंगाने संदर्भीय शासन निर्णय क्रमांक २ अन्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला असून या अहवालातील शिफारशींच्या अनुषंगाने आरोग्य विज्ञानाच्या विविध अभ्यासक्रमांस प्रवेशित झालेल्या दिव्यांग विद्यार्थ्यांना परीक्षेकरीता विविध सोयी सवलती लागू करण्यासंदर्भात निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) विद्यार्थ्यांची खालीलप्रमाणे वर्गवारी आहे:-

१. पूर्णत: अंध (Blindness)

२. अंशत: अंध (Low Vision/ Partial Blind)

३. कुष्ठरोग निवारित (Leprosy Cured Persons)

४. कर्णबधिर (Hearing Impairment - deaf and hard of hearing)

५. लोकोमोटर डिसेबिलीटी अस्थिव्यंगासह (Loco-motor Disability including Orthopedic disability)

६. शारिरीक वाढ खुंटणे (Dwarfism)

७. बौध्दिक अक्षम (मतिमंद/ गतिमंद) (Intellectual Disability - Mentally challenged/ Slow Learners)

८. मानसिक आजार ( Mental Illness)

९. स्वमग्न (Autism Spectrum Disorder)

१०. सेरेब्रल पाल्सी (Cerebral palsy)

११. स्नायुंची विकृती (Muscular Dystrophy)

१२. मज्जासंस्थेचे तीव्र आजार (Chronic Neurological Conditions)

१३. अध्ययन अक्षम (Specific Learning Disabilities)

१४. बहुविध द्द्धन उपदयरर (Multiple Sclerosis)

१५. भाषण (वाचा) व भाषा अक्षमत्व (Speech and Language Disability)

१६. थॅलस्सेमिया (Thalassemia)/ कॅन्सर (Cancer)

१७. हिमोफिलिया (Hemophilia)

१८. सिकल सेल आजार (Stickle Cell Disease)

१९. बहुविकलांग (Multiple Disabilities)

२०. ॲसिड ॲटॅक व्हिक्टीम (Acid Attack victim)

२१. पार्किसन्स आजार (Parkinson’s Disease)

**(१) महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक या विद्यापीठाशी संलग्नित आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमांचे शिक्षण घेणाऱ्या उपरोक्त सर्व प्रकारातील दिव्यांग विद्यार्थ्यांना खालील नमूद समान सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध करुन देण्यात याव्यात:-**

अ) विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहिल. (शक्यतो विद्यार्थी ज्या महाविद्यालयामध्ये शिक्षण घेत आहे तेच महाविद्यालय किंवा त्याच्या घराजवळचे महाविद्यालय परीक्षा केंद्र असावे) सर्व प्रकारच्या दिव्यांग विद्यार्थ्यांच्या उत्तरपत्रिका पी.डब्ल्यू.डी.(Persons with Disabilities) शिक्का मुद्रीत करुन तपासणीकरीता वेगळया ठेवण्याची व्यवस्था करावी.

ब) विद्यार्थ्यांना सर्व प्रकारच्या परीक्षेच्या (Internal, External, Practical) प्रश्नपत्रिका सोडविण्यासाठी प्रति तास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील. परंतू सदरची सोय किंवा सवलत वरील आजार (दिव्यांग) वर्गवारीतील अनुक्रमांक (५), (६), (१६), (१७) यांना लागू राहणार नाहीत.

क) अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना सत्रातील प्रत्येक परीक्षेमध्ये लेखी, तोंडी, प्रात्यक्षिक, अंतर्गत व प्रकल्प संशोधन परीक्षेमध्ये एकूण गुणांच्या ३ टक्के गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी. परंतू सदर सोय किंवा सवलत फक्त वरील आजार (दिव्यांग) वर्गवारीतील अनुक्रमांक (७), (८), (९), (१०), (१२) व (१३) यांना लागू राहील.

ड) परीक्षेसाठी विद्यार्थ्यांना महाविद्यालयाचे प्राचार्य/ अधिष्ठाता यांचे पूर्व परवानगीने लेखनिक घेता येईल. मात्र लेखनिकांची व्यवस्था पालकांनी महाविद्यालयाचे सहकार्याने करावी अन्यथा शक्य झाल्यास महाविद्यालयाने लेखनिकांची यादी ठेवावी व यादीतून लेखनिक देण्यात यावा. यासाठीचा पत्रव्यवहार परीक्षा आवेदनपत्र सादर करतेवेळी करण्यात यावा.

इ) सर्व प्रकारच्या दिव्यांग मुलांसाठी स्पेलींग, व्याकरण, विरामचिन्हे याबाबतीत गुणदान कमी करण्यात येवू नये, परंतू सदर सोय किंवा सवलत फक्त वरील आजार (दिव्यांग) वर्गवारीतील अनुक्रमांक (७), (८), (९), (१०), (१२) व (१३) यांना लागू राहील.

ई) यापैकी काही वर्गवारीसाठी विद्यार्थ्यांना परीक्षेसाठी वर्गात आवश्यक असलेल्या हजेरी/ उपस्थिती यामध्ये फक्त १० टक्के सवलत देण्यात येईल. त्यासाठी संबंधित महाविद्यालयाच्या प्राचार्यांची परवानगी बंधनकारक राहिल.

वरीलप्रमाणे सर्वसाधारण सोयी-सवलती दिव्यांग वर्गवारीतील विद्यार्थ्यांना देय राहतील. याशिवाय त्यांचे दिव्यांगत्वाच्या प्रकारानुसार काही विशेष सोयी-सवलती खालीलप्रमाणे देय राहतील.

**(२) पूर्णत: अंध (Blindness) व अंशत: अंध (Low Vision/ Partial Blind) विद्यार्थ्यांकरीता सवलती :-**

१) अंशत: अंध विद्यार्थ्यांना उत्तरपत्रिका लिहिण्यासाठी स्केचपेनचा व प्रश्नपत्रिका वाचण्यासाठी ग्लास मॅग्नीफायरचा वापर करता येईल.

२) ज्यावेळी दृष्टीहीन मुलगा बऱ्याच वेळेपासून ब्रेलमध्ये लिहित असेल आणि ज्यामुळे त्याला थकवा जाणवत असले अशावेळी त्यास काही काळ विश्रांती देण्यात यावी, तथापि ही वेळ सवलतीच्या एकूण वेळेपेक्षा जास्त नसावी.

३) ज्यावेळी ब्रेलवाचन, लेखक चाचणी असेल अशावेळी ब्रेललिपीतील चुकांबाबत गुण कमी करुन नयेत. तसेच गरज असेल अशावेळी मौखिक पध्दतीने प्रश्नांची उत्तरे विचारुन त्याला कितपत ज्ञान आहे याबद्दल चाचणी घेण्यात यावी. चित्र/ आकृत्या याऐवजी पर्यायी प्रश्न देण्यात यावेत. वस्तुनिष्ठ प्रश्नांसाठी सुस्पष्ट सूचना देण्यात याव्यात.

४) ज्यावेळेस निबंधात्मक प्रश्न असतात आणि ते प्रश्न ब्रेल लिपीमध्ये लिहितात अशावेळी सदर प्रश्नास गुणदान करताना उत्तरे मोठ्या प्रमाणात लिहिलेले आहे, हे न पाहता मुख्य मुद्यांवर (Key Points) लक्ष देण्यात यावे. महाविद्यालयाने या विषयीचा प्रत्रव्यवहार विद्यापीठाशी करणे अत्यावश्यक आहे.

**(३) कुष्ठरोग निवारित विद्यार्थ्यांकरिता (Leprosy Cured Person) सवलती :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष सोयी-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार समान सायी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

**(४) कर्णबधिर (Hearing Impairment - deaf and hard of hearing) विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष सोयी-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार समान सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

**(५) लोकोमोटर डिसेबिलिटी अस्थिव्यंगासह (Loco-motors Disability including Orthopedic disability), बहुविकलांग (Multiple Disability) व सेरेब्रल पाल्सी (Cerebral Palsy) विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

अ) विद्यार्थ्यांच्या आजाराचे किंवा अपंगत्वाचे गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेवून शिकत असलेल्या महाविद्यालयातच विद्यार्थ्यांच्या शरीराच्या योग्य स्थितीस सुसह्य आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. तथापि, यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/ पूर्व परवानगी घ्यावी.

ब) हे विद्यार्थी जास्त दाब देऊन लिहितात त्यासाठी आवश्यकतेनुसार जाड पानांची कागद/ उत्तरपत्रिका देण्यात यावी.

**(६) शारिरीक वाढ खुंटणे (Dwarfism) :-**

विद्यार्थ्यांच्या आजाराचे किंवा अपंगत्वाचे गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेवून शिकत असलेल्या महाविद्यालयातच विद्यार्थ्यांच्या शरीराच्या योग्य स्थितीस सुसह्य आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. तथापि, यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/ पूर्व परवानगी घ्यावी.

**(७) बौध्दिक अक्षम (मतिमंद/ गतिमंद) (Intellectual Disability-Mentally Challenged/ Slow Learners) :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष सोयी-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार समान सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

**(८) मानसिक आजार (Mental Illness) :-**

अ) या विद्यार्थ्यांची परीक्षा वेगळ्या वर्गात घेण्यात यावी.

ब) विद्यार्थी अचानक आक्रमक/ हिंसक बनला तर परिस्थिती हाताळू शकेल असाच पर्यवेक्षक नेमावा.

क) लेखी परीक्षेएवजी ऑडिओ/ व्हिडीओ रेकॉर्डर वापरुन मौखिक परीक्षा घेण्याची परवानगी देण्यात यावी.

**(९) स्वमग्न (Autism Spectrum Disorder) विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

अ) विद्यार्थ्यांना पूर्ण उत्तरपत्रिका किंवा उत्तरपत्रिकेचा काही भाग लिहिण्यासाठी लेखनिक घेण्यास परवानगी देण्यात येईल. जर हे विद्यार्थी स्वत: प्रश्नपत्रिका सोडवत असताना मध्येच थकले, पुढे

पश्नपत्रिका सोडवू शकत नाही असे वाटल्यास त्यांना महाविद्यालयातील प्रत्यक्ष अध्यापनाशी संबंध नसलेला कोणताही कर्मचारी लेखनिक म्हणून घेता येईल. हा कर्मचारी या विद्यार्थ्यांने बोललेली भाषा समजू शकत असावा. या लेखनिकांची काळजीपूर्वक निवड करावी. हा लेखनिक ऑटिस्टिक विद्यार्थी काय सांगतो ते समजून लिहू शकेल असा असावा.

ब) या विद्यार्थ्यांची परीक्षा वेगळ्या वर्गात घेण्यात यावी.

क) विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी त्याला खात्री वाटेल अशी व्यक्ती परीक्षा वर्गाजवळ उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात यावी.

ड) या गटात मोडणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांची कारक कौशल्य अविकसित असतात. याचा विचार करुन त्यांना वेगळ्या प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर वापरण्याची परवानगी देण्यात यावी.

**(१०) स्नायुंची विकृती** (Muscular Dystrophy) **विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

**(११) मज्जासंस्थेचे तीव्र आजार** (Chronic Neurological Conditions) :-

या विद्यार्थ्यांची बैठक व्यवस्था वेगळ्या वर्गात करावी.

**(१२) अध्ययन अक्षम** (Specified Learning Disabilities) **विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

अ) विद्यार्थ्यांना पूर्ण उत्तरपत्रिका किंवा उत्तरपत्रिकेचा काही भाग लिहिण्यासाठी लेखनिक घेण्यास परवानगी देण्यात येईल. जर हे विद्यार्थी स्वत: प्रश्नपत्रिका सोडवत असताना मध्येच थकले, पुढे प्रश्नपत्रिका सोडवू शकत नाही असे वाटल्यास त्यांना महाविद्यालयातील प्रत्यक्ष अध्यापनाशी संबंध नसलेला कोणताही कर्मचारी लेखनिक म्हणून घेता येईल. हा कर्मचारी या विद्यार्थ्यांने बोललेली भाषा समजू शकत असावा. या लेखनिकांची काळजीपूर्वक निवड करावी. हा लेखनिक अध्ययन अक्षम विद्यार्थी काय सांगतो ते समजून लिहू शकेल असा असावा.

ब) प्रात्यक्षिक आणि प्रकल्प परीक्षेस विद्यार्थ्यांना या विषयाची तोंडी परीक्षा/ बहुपर्यायी उत्तरे असलेली लेखी परीक्षा (प्रात्यक्षिकांवर आधारित) देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जातील.

क) या गटात मोडणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांची कारक कौशल्य अविकसित असतात. याचा विचार करुन त्यांना वेगळ्या प्रकारची पेन्सील, पेन, ग्रीपर वापरण्याची परवानगी देण्यात यावी.

**(१३) मेंदू व मज्जापेशी काठीण्य (Multiple Sclerosis) विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

या विद्यार्थ्यांची बैठक व्यवस्था वेगळ्या वर्गात करावी.

**(१४) भाषण (वाचा) व भाषा अक्षमत्व (Speech and Language Disability) विद्यार्थ्यांकरिता सवलती :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष सोयी-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार समान सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

**(१५) थॅलस्सेमिया (Thalassemia)/ कॅन्सर (Cancer) :-**

अ) विद्यार्थ्यांसाठी आजाराचे गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेऊन शिकत असलेल्या महाविद्यालयातच या मुलांसाठी विशेष तयार केलेले टेबल, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. तथापि, यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/ पूर्व परवानगी घ्यावी.

ब) अचानक उपचार करावे लागतील अशी स्थिती उत्पन्न झाल्यास किंवा परीक्षेच्या कालावधीतच उपचारासाठी हॉस्पीटलमध्ये दाखल व्हावे लागेल तर विद्यार्थ्यांच्या भविष्याचा विचार करुन त्यांना पुन:परीक्षेची (Re-Exam) परवानगी देण्यात यावी. विषय शिक्षक, महाविद्यालयाचे प्राचार्य व परीक्षा विभागाचे प्रमुख यांनी यासाठी समन्वय ठेवावा.

क) विद्यार्थ्यांच्या आजाराची तीव्रता/गांभीर्य आणि त्या आजाराची संसर्ग होण्याची शक्यता लक्षात घेऊन या विद्यार्थ्यांसाठी बैठक व्यवस्था वेगळया वर्गात करावी. वेळ प्रसंगी विशेष पर्यवेक्षकाची नेमणूक करावी.

ड) विद्यार्थ्यांना लिहीणे सोयीचे व्हावे यासाठी वेगळया प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर, संगणक देण्याची व्यवस्था उपलब्ध करावी.

इ) विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी त्याला खात्री वाटेल अशी व्यक्ती परीक्षा वर्गाजवळ उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात यावी.

**(१६) हिमोफिलिया** (Haemophilia) :-

अ) विद्यार्थ्यांच्या आजाराचे गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेऊन शिकत असलेल्या महाविद्यालयातच या मुलांसाठी विशेष तयार केलेले टेबल, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. तथापि, यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/ पूर्व परवानगी घ्यावी.

ब) अचानक उपचार करावे लागतील अशी स्थिती उत्पन्न झाल्यास किंवा परीक्षेच्या कालावधीतच उपचारासाठी हॉस्पीटलमध्ये दाखल करावे लागल्यास अशा विद्यार्थ्यांच्या भविष्याचा विचार करुन त्यांना पुन:परीक्षेची (Re-Exam) परवानगी देण्यात यावी. विषय शिक्षक, महाविद्यालयाचे प्राचार्य व परीक्षा विभागाचे प्रमुख यांनी यासाठी समन्वय ठेवावा.

क) विद्यार्थ्यांच्या आजाराची तीव्रता/गांभीर्य आणि त्यांच्या आजाराचे संसर्गची शक्यता लक्षात घेऊन या विद्यार्थ्यांसाठी बैठक व्यवस्था वेगळया वर्गात करावी. वेळ प्रसंगी विशेष पर्यवेक्षकाची नेमणूक करावी.

ड) विद्यार्थ्यांना लिहीणे सोयीचे व्हावे यासाठी वेगळया प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर, संगणक देण्याची व्यवस्था उपलब्ध करावी.

इ) विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी त्याला खात्री वाटेल अशी व्यक्ती परीक्षा वर्गाजवळ उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात यावी.

**(१७) सिकल सेल** (Sickle Cell Disease) :-

अ) अचानक उपचार करावे लागतील अशी स्थिती उत्पन्न झाल्यास किंवा परीक्षेच्या कालावधीतच उपचारासाठी रुग्णालयामध्ये दाखल करावे लागल्यास अशा विद्यार्थ्यांच्या भविष्याचा विचार करुन त्यांना पुन:परीक्षेची (Re-Exam) परवानगी देण्यात यावी. विषय शिक्षक, संबंधित महाविद्यालयाचे प्राचार्य व परीक्षा विभागाचे प्रमुख यांनी यासाठी समन्वय ठेवावा.

ब) विद्यार्थ्यांच्या आजाराची गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेऊन गरज असल्यास त्यांना लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी. यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/ पूर्व परवानगी घ्यावी.

क) विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी त्याला खात्री वाटेल अशी व्यक्ती परीक्षा वर्गाजवळ उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात यावी.

**(१८) ॲसिड ॲटॅक व्हिक्टीम (Acid Attack Victim) विद्यार्थ्यांसाठी सवलत :-**

अ) विद्यार्थ्यांसाठी आजाराचे गांभीर्य/ असक्षमता लक्षात घेऊन शिकत असलेल्या महाविद्यालयातच या मुलांसाठी विशेष तयार केलेले टेबल, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी. तथापि, यासाठी संबंधित महाविद्यालयाने विद्यापीठाची मान्यता/पूर्व परवानगी घ्यावी.

ब) विद्यार्थ्यांना लिहीणे सोयीचे व्हावे यासाठी वेगळया प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर व संगणक उपलब्ध करुन देण्याची व्यवस्था करावी.

**(१९) पार्किंसन्स (Parkinson's Disease) :-**

या आजारातील विद्यार्थ्यांना विशेष सोयी-सवलती देण्याची आवश्यकता नाही. सदर विद्यार्थ्यांना वरील अनुक्रमांक (१) नुसार समान सोयी-सुविधा व सवलती उपलब्ध होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०७१११४५०४४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2018.08.09 16:18:17 +05'30'

**(सुरेन्द्र प्र. चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपालांचे सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. मंत्री (विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागासवर्ग आणि इतर मागासवर्ग कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागासवर्ग आणि इतर मागासवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापिठ, नाशिक.
सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण/ शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई.
संचालक-प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे.
अधिष्ठाता/प्राचार्य, आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमाची राज्यातील सर्व महाविद्यालये (संचालनालयामार्फत).
सर्व मंत्रालयीन विभाग.
निवडनस्ती/शिक्षण-२.